प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण (PM-POSHAN) योजनेतंर्गत अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गत निधी वितरणाबाबत... (सन २०२४-२५)

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२४/प्र.क्र.१२७/एस.डी.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: २० फेब्रुवारी, २०२५

**वाचा:-**

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/प्र.क्र.१८४/एस.डी.३, दि.०८ मे, २०२४.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/प्र.क्र.९२/एस.डी.३, दि.१४ ऑगस्ट, २०२४.

३) केंद्र शासन आदेश क्र. F.No.३-४/२०२४-PMP-५, दि.२७/०९/२०२४.

४) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ -३, दि.०८/०१/२०२५.

५) आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/कार्यासन-६, दि.१७ जानेवारी, २०२५.

६) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०२४/प्र.क्र.८०/अर्थ -३, दि.१२/०२/२०२५.

७) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२४-Desk (PMP-५) दि.१७ फेब्रुवारी, २०२५

**प्रस्तावना :**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत केंद्र शासनाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील मंजूर केंद्र हिस्स्याच्या निधीमधील पहिल्या हप्त्याचा रु.११६२२.२८ लक्ष इतका निधी संदर्भाधिन दि.२७ सप्टेंबर, २०२४ रोजीच्या आदेशान्वये राज्य शासनास उपलब्ध करुन दिला होता. सदरप्रमाणे केंद्र व राज्य हिस्सयाचा निधी वितरीत करण्यात आला आहे. सद्यस्थितीत सदर योजनेंतर्गत संदर्भाधिन दि.१७ फेब्रुवारी, २०२५ रोजीच्या आदेशान्वये केंद्र शासनामार्फत दुसऱ्या हप्त्याचा रु.११६२२.२८ लक्ष इतका निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीची विगतवारी सर्वसाधारण, अनुसूचित जाती व जमाती या घटकांतर्गत केली आहे. उपरोक्त केंद्र हिस्स्याच्या निधीपैकी अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गत केंद्र हिस्स्याचा

रु.१६७४.७७ लक्ष इतका निधी आहे. प्रस्तुत योजनेकरीता केंद्र व राज्य हिस्स्याच्या खर्चाचे प्रमाण ६०::४० असे आहे. तथापि, स्वयंपाकी तथा मदतनीस यांच्या रु.२५००/- प्रती माह मानधनामध्ये रु.६००/- केंद्र हिस्सा व रु.१९००/- राज्य हिस्सा आहे. त्यामुळे राज्य हिस्सामधून समरुप निधीपेक्षा जादा निधी वितरीत करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गत केंद्र हिस्स्याचा रु.१६७४.७७ लक्ष व राज्य हिस्साचा रु.१८३७.५५ लक्ष असा एकूण रु.३५१२.३२ लक्ष इतका निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून अनुसूचित जमाती उपयोजनांतर्गत केंद्र व राज्य हिस्सा मिळून रु.३५१२.३२ लक्ष (रुपये पस्तीस कोटी बारा लक्ष बत्तीस हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पीय तरतूद + पुरवणी मागणी | वितरणास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १. | मागणी क्र. टी - ५ २२०२ - सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, ७९६ - जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) (०८) प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (पीएम-पोषण) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ I ५३२) | रु.१२४८५.०९ लक्ष | रु.१६७४.७७ लक्ष |
| २. | मागणी क्र. टी - ५ २२०२ - सर्वसाधारण शिक्षण, ०१ - प्राथमिक शिक्षण, ७९६ - जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) (०९) प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (पीएम-पोषण) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ I ५४१) | रु.११२०७.२१ लक्ष | रु.१८३७.५५ लक्ष |
| | **एकूण** | **रु.२३६९२.३० लक्ष** | **रु.३५१२.३२ लक्ष** |

२. सदरचा शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/कार्यासन-६, दि.१७ जानेवारी, २०२५ अन्वये तसेच, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.०८ जानेवारी, २०२५ व दि.१२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. केंद्र शासनाने दि.१७ फेब्रुवारी, २०२५ रोजीच्या आदेशान्वये उपलब्ध करुन दिलेला केंद्र हिस्साचा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने दि.२० फेब्रुवारी, २०२५ रोजीच्या ई-मेलव्दारे दिले आहेत.

४. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाच्या दि.१७ फेब्रुवारी, २०२५ रोजीच्या निधी वितरण आदेशामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

५. प्रस्तुत निधीच्या उपयोजनाकरीता आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तसेच, राज्य समन्वय अधिकारी, प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजना, स्वतंत्र कक्ष, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर निधी केंद्र व राज्य शासनने वेळोवळी दिलेले निर्देश/आदेश/शासन निर्णय/परिपत्रक/सूचना यांना अनुसरुन विहित कालावधीत खर्च करण्याची दक्षता शिक्षण संचालक (प्राथ.) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेण्यात यावी. तसेच, सदर निधी खर्च केल्यानंतर याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

७. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२०१२१४०१४७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2025.02.20 12:15:00 +05'30'

**(प्रमोद पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१९) नियोजन विभाग, कार्यासन १४७१, मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती - एस.डी. ३